**राज्यातील वायुवेग पथकांसाठी नवीन इंटरसेप्टर वाहने तसेच सदर वाहनांवर Vehicle Top Mounted Radar Device खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२३/प्र.क्र.९६/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २१ ऑगस्ट, २०२४

**वाचा :**

१) गृह (परिवहन) विभाग, शासन निर्णय क्र.एमव्हीआर ०३२१/प्र.क्र.४१/परि-२, दि.३१ मार्च,२०२३.

२) मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील दि.१०.०४.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.पआका/९६ इंटरसेप्टर वाहने /निरीक्षण/का-१० /२०२३ / जा.क्र.११९२७ दि.०९ ऑक्टोबर, २०२३.

४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.पआका/९६ इंटरसेप्टर वाहने /

५) निरीक्षण/का-१०/२०२३/जा.क्र.४६२४ व जा.क्र. ४६२५, दि.१२ एप्रिल, २०२४ .

६) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.पआका/का-१० /वाहन आढावा/२०२४ / जा.क्र. ८६०८ दि.२६ जुलै, २०२४.

**प्रस्तावना :**

राज्यातील रस्त्यावरील अंमलबजावणी व रस्ता सुरक्षाविषयक जनजागृतीचे काम परिणामकारक होवून अपघातांना आळा घालण्यासाठी गृह ( परिवहन) विभागाच्या अधिपत्याखालील वायुवेग पथकांसाठी नवीन इंटरसेप्टर वाहने तसेच सदर वाहनांवर Vehicle Top Mounted Radar Device खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. आता या प्रकरणी शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:**

गृह (परिवहन) विभागाच्या अधिपत्याखालील कार्यरत वायुवेग पथकांसाठी ६९ नवीन इंटरसेप्टर वाहने (प्रति वाहन रु.१३.४० लक्ष या दराने ) रु.९,२४,६०,०००/- (अक्षरी रु. नऊ कोटी चोवीस लक्ष साठ हजार फक्त) व सदर वाहनांवर Vehicle Top Mounted Radar Device बसविणेकरिता रु.२२,७९,७६,०००/- (अक्षरी रुपये बावीस कोटी एकोणऐंशी लक्ष श्याहत्तर हजार फक्त) असे एकूण **रु.३२,०४,३६,०००/- (अक्षरी रुपये बत्तीस कोटी चार लक्ष छत्तीस हजार फक्त)** इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वाहने तसेच वाहनांवर Vehicle Top Mounted Radar Device खरेदी करताना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ व दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, GeM पोर्टलवरील अटी व शर्ती नुसार खरेदी प्रक्रियेची विहित कार्यपद्धती अवलंबवावी.

३. यासाठी येणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजना (५०५५ ००५६) ५१ मोटार वाहने " या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२१११५४२३०२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2024.08.21 12:09:24 +05'30'

**( सु. बा. आपटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री (परिवहन) यांचे अपर मुख्य सचिव
३. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
७. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती (परिवहन-४)